नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा
विषयक खर्च योजना (S.R.E.)
निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- एनएएक्स-०२२१/प्र.क्र.८०/विशा-१ ब,**
दुसरा मजला, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- २४ डिसेंबर, २०२१.

**वाचा-**

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अ.शा. पत्र क्र.- पोमसं/२१-अ/१९५/SRE Scheme/ ६०/२०१९, दि. ७/१२/२०२१.

**प्रस्तावना-**

नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च योजनेअंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता रु. ६६६७.६९ लक्ष (६०% केंद्र हिस्सा रु.४०००.६१ लक्ष आणि ४०% राज्य हिस्सा रु. २६६७.०८ लक्ष) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. प्रत्यक्षात केंद्र शासनाने (६०% केंद्र हिस्सा रु. ३१७४.८८ लक्ष आणि ४०% राज्य हिस्सा रु. १३१६.५९ लक्ष) अशा एकूण रु. ४४९१.४७ लक्ष रक्कमेच्या वार्षिक आराखड्यास मान्यता दिलेली आहे.

सदर योजनेअंतर्गत केंद्र शासनाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता मंजूरी दिल्यानुसार निधी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षलविरोधी अभियान, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च (Security Related Expenditure) योजनेअंतर्गत केंद्र शासनाने मंजूरी दिलेल्या केंद्र व राज्य हिश्श्याच्या अनुक्रमे रु. ३१७४.८८ लक्ष आणि रु. १३१६.५९ लक्ष रक्कमेपैकी ६०% निधीच्या वितरणास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे.

वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुलक्षून केंद्र व राज्य हिश्श्याच्या ६०% अनुक्रमे रक्कम रु. १९०४.९२ लक्ष (अक्षरी रुपये एकोणीस कोटी चार लक्ष ब्याण्णव हजार मात्र) व रु. ७८९.९५ लक्ष (अक्षरी रुपये सात कोटी एकोणनव्वद लक्ष पंच्याण्णव हजार मात्र) अशा एकूण रु. २६९४.८७ लक्ष (अक्षरी रुपये सहवीस कोटी चौऱ्याण्णव लक्ष सत्त्याऐंशी हजार मात्र) इतक्या निधीच्या वितरणास नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च योजनेअंतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेला कार्यक्रम राबविण्यासाठी शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर मंजूरी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) ज्या प्रयोजनासाठी निधी वितरीत केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावा.

(ब) सदर रक्कम संकीर्ण देयकांवर काढता येणार नाही. तसेच पुनर्विनियोजनही करता येणार नाही. त्यामुळे सदर निधी दि. ३१/३/२०२२ पूर्वी खर्च करण्याची जबाबदारी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई/विशेष पोलीस महानिरीक्षक नक्षल विरोधी अभियान, नागपूर यांची राहील.

३. केंद्र हिश्श्याचा आणि राज्य हिश्श्याचा खर्च खालील नमूद लेखाशीर्षाखाली मंजूर झालेल्या निधीतून करण्यात यावा.

| लेखाशीर्ष | रक्कम रुपये लक्ष |
|---|---|
| मागणी क्र.- बी-१, २०५५, पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (०८) नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च (६०% केंद्र पुरस्कृत) (कार्यक्रम), ५० इतर खर्च (२०५५ ०४८२) | १९०४.९२ |
| मागणी क्र.- बी-१, २०५५, पोलीस (००) १०९ जिल्हा पोलीस (००) (१६) नक्षलग्रस्त भागातील सुरक्षा विषयक खर्च, (४०% राज्य हिस्सा) (कार्यक्रम), ५० इतर खर्च (२०५५ A १८६) | ७८९.९५ |
| **एकूण** | **२६९४.८७** |

४.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.- ७८९/२०२१/व्यय-७, दि. २३/१२/२०२१ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२४१३२९५६६१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Amar Chandrakant Zaware

Digitally signed by Amar Chandrakant Zaware
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=cdf8f464607b97618e17350ee53aebf0c41d091cb3635a52bc9d8ec546004adb, serialNumber=b31a8de567057e1c91d2d46b233645dce61bc1c39da26f8e6dded5d3c23e2460, cn=Amar Chandrakant Zaware
Date: 2021.12.24 13:31:01 +05'30'

**( अमर चं. झावरे )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग.

**प्रत:-**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
३. अपर पोलीस महासंचालक (विशेष कृती), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४. विशेष पोलीस महानिरीक्षक (नक्षल विरोधी अभियान), नागपूर.
५. पोलीस उप महानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, नागपूर.
६. पोलीस अधीक्षक, गडचिरोली / गोंदिया.
७. अधिदान व लेखाधिकारी, नागपूर / चंद्रपूर / गडचिरोली / गोंदिया.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर / चंद्रपूर / गडचिरोली / गोंदिया.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / चंद्रपूर / गडचिरोली / गोंदिया.
१०. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कक्ष अधिकारी (पोल-७), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी, व्यय-७/अर्थोपाय/अर्थ-११, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. संग्रहार्थ नस्ती / निवडनस्ती (वि.शा. १ ब).